**महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) संवर्गातील दि.१/०१/०९ स्थित अंतिम ज्येष्ठतासूची**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन आदेश क्रमांक-आकृवि-१२१०/प्र.क्र.४५५ /१५-अे,**
**मंत्रालय विस्तार मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : ३१ डिसेंबर,२०१०.**

**वाचा :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक-आकृवि-१२०९/प्र.क्र.४३८/१५-अे, दि.१८/११/०९
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.अेईएक्स/(१)/प्र.क्र.१/जे.सु.१०/गट-अ/ आस्था-१/१०/१२१८, दि.१५/११/१०

## शासन आदेश

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन कृषि व पदुम विभागाच्या आयुक्त (कृषि) यांच्या आस्थापनेवरील **महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी )** संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.१/०१/२००९ स्थित अंतरिम ज्येष्ठतासूची संदर्भाधीन क्र.१, दि.१८/११/२००९ च्या शासन आदेशान्वये प्रसिद्ध करुन संबंधित अधिकाऱ्यांचे आक्षेप / तक्रार/ त्रुटी असल्यास त्याबाबतच्या हरकती मागविण्यात आलेल्या होत्या.

२. प्रस्तुत अंतरिम ज्येष्ठतासूचीच्या अनुषंगाने सर्व संवर्गातून प्राप्त झालेली अभिवेदने विचारात घेऊन **महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी )** संवर्गाची दि.१/०१/२००९ स्थित अंतरिम ज्येष्ठतासूची या आदेशाद्वारे **अंतिमतः** खालील अटींच्या अधीन प्रसिद्ध करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) ज्येष्ठतासूची मध्ये प्रस्तावित करण्यात आलेले मानीव दिनांक हे फक्त सेवा ज्येष्ठतेसाठी प्रस्तावित आहेत. पदोन्नती ही सेवाप्रवेश नियमातील तरतुदींनुसार असल्याने केवळ ज्येष्ठतेसाठी मानीव दिनांक प्राप्त झाला म्हणून पदोन्नतीसाठी पात्र आहे असे गृहीत धरुन, त्या अनुषंगाने कोणतेही लाभ देय राहणार नाहीत.

ब) महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गातील सेवा ज्येष्ठतेच्या संदर्भात मा.लोक आयुक्त / शासन स्तरावर तसेच वेगवेगळया न्यायाधिकरण / न्यायालयातील प्रलंबित न्यायनिर्णयाच्या व मा.उच्च न्यायालयात प्रलंबित याचिका क्र८४५२/२००४ मधील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधिन राहून अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिद्ध करण्यात येत आहे.

३.                सदर शासन आदेश शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आले असून सांकेतांक क्र. **२०११०१०४१४५६४५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सोबत - वरीलप्रमाणे**

सही /-

**(संदिप ढाकणे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे-१ ( १० प्रति)
सर्व विभागीय कृषि सहसंचालक {मार्फत आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे}
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी {मार्फत आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, पुणे}
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
संबंधित अधिकारी, {मार्फत आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे}
निवड नस्ती